२१७

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८,
भाग-पहिला, उप विभाग-एक ते पाच मध्ये प्रदान करण्यात
आलेल्या वित्तीय अधिकार नव्याने समाविष्ट वित्तीय अधिकार
भाग-पहिला, उप विभाग - तीन, अनुक्रमांक - ४

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय, क्रमांक : विअप्र-१०.०३/प्र.क्र. ६६/२००३/विनियम
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २२ जुलै, २००३

वाचा :- १) शा.नि., वि.वि., क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र. ४६/२००१/विनियम, दिनांक ११.७.२००१
२) शा.नि., वि.वि., क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र. ६३/२००१/विनियम, दिनांक २०.११.२००१
३) शा.नि., वि.वि., क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र. ६३/२००१/विनियम, दिनांक २०.३.२००१
४) शा.नि., वि.वि., क्रमांक : विअप्र-१०.०३/प्र.क्र. १५/२००३/विनियम, दिनांक ९.४.२००३

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र.४६/ २००१/ विनियम, दिनांक ११ जुलै, २००१ अनुसार राज्य शासनाचे प्रशासनिक विभाग प्रमुख, विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. सदर वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक ते पाच पैकी प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये नव्याने वित्तीय शक्तींचा समावेश करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ११ जुलै २००१ अन्वये सुधारित केलेल्या वित्तीय अधिकार नियमापुस्तिका, १९७८ मधील अधिकारात भाग-पहिला, उप विभाग - तीन मध्ये अनुक्रमांक ४ समोरील स्तंभ ३ खालील शक्तीमध्ये शक्ती क्रमांक-(क) नव्याने समाविष्ट करण्यात येत असून या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे राज्य शासनाचे प्रशासनिक विभाग प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात येत आहे. या वित्तीय शक्तीचा वापर संदर्भाधीन क्रमांक - १ येथील शासन निर्णय, वित्त विभाग मधील परिच्छेद - १ ते १३ मधील सर्व सूचना, अटी व शर्ती यांच्या अधिन राहून करण्यात यावा.

३. ज्या प्रशासकीय विभागांना वेळोवेळी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत, जेथे एखाद्या अधिकाऱ्याचे असे विद्यमान अधिकार वित्तीय मर्यादेच्या किंवा इतर कोणत्याही शर्तींच्या दृष्टीने अधिक उदार असतील तेथे, असे अधिकार ज्या शर्तींच्या अधीन प्रदान करण्यात आले असतील त्या शर्तींच्या अधीन ते अधिकार यापुढेही अंमलात राहतील असे मानले जाईल.

४. ज्या प्रशासनिक विभागांना वेळोवेळी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत त्यांनी अशाप्रकारे त्यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा सर्व स्तरांवर कोणताही हस्तक्षेप, भिती अथवा अनुग्रह याशिवाय त्याचा पूर्णपणे व परिणामकारक वापर करण्यात येत असल्याची खात्री करुन घ्यावी.

५. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८, भाग-पहिला आणि संबंधित नियम यामध्ये जेथे सुधारणा आवश्यक आहेत, अशा आवश्यक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

गो.जो.रसाळ,
शासनाचे उप सचिव.

प्रति,
* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०

H-752 (12500+8-03) 1

* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
* १७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
* १८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१
२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक / अमरावती
२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. सर्व उप कोषागार अधिकारी
२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग( कार्यासन -हाऊसिंग सेल ,१९ -सी ),मंत्रालय, मुंबई-३२
२८. सर्व विभागीय आयुक्त
२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३४. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३६. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

* पत्राद्वारे.

H-752 (~~12010~~-8-03) 1a.
12500+15

(शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-१०.०३/प्र.क्र. ६६/२००३/विनियम, दिनांक २२ जुलै, २००३ चे परिशिष्ट)

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८

## भाग-पहिला

### उप-विभाग--तीन

महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखाली "नव्याने" प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार

भाग- पहिला, उप विभाग -तीन

| अनु क्र. | नियम क्रमांक | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| ४ | २७.(२) | (कं) योजनेतर योजनेखाली असलेली अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देणे. | प्रशासनिक विभाग | दिनांक १ मार्च ते २८ फेब्रुवारी | १) प्रशासकीय विभागाचा तसेच ज्या कार्यालयातील पदांना मुदतवाढ द्यावयाची आहे त्या कार्यालयांचा पदांचा आढावा उच्चस्तरीय सचिव समितीने मान्य केलेला असून एकूण पदसंख्या अंतिम ठरवून सुधारित आकृतिबंधाचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेला असावा.<br>२) सदर योजनेतर योजना त्या वर्षासाठी सुरु ठेवण्यास वित्त विभागाची सहमती असावी, म्हणजेच सदर योजनेसाठी त्या त्या वर्षाच्या अर्थसंकल्पात तरतूद करण्यात आलेली असावी. |

H-752 (12515-8-03) 2